**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै.(श्री.) गंभीरराव बाळासाहेब देशमुख, मुख्याध्यापक**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२२/प्र.क्र.२१/टीएनटी-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२

दिनांक : २७ मार्च, २०२५

**संदर्भ :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. हिंगोली यांचे पत्र क्र.जिपहि/शिविप्रा/सेनिवे/कावि/४०१/२०२४, दि.०२/०४/२०२४

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. हिंगोली यांचे पत्र क्र.जिपहि/शिविप्रा/सेनिवे/कावि/४०२/२०२४, दि.०२/०४/२०२४

५) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/ संकीर्ण/४८९०/२०२४, दिनांक १६/०७/२०२४

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) गंभीरराव बाळासाहेब देशमुख, मुख्याध्यापक, केंद्र प्राथमिक शाळा, खानापूर चित्ता ता.जि. हिंगोली यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०७/०८/२०२० रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) देशमुख, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. हिंगोली यांनी संदर्भ क्र. (३) व (४) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

४. कै.(श्री.) गंभीरराव बाळासाहेब देशमुख, मुख्याध्यापक, केंद्र प्राथमिक शाळा, खानापूर चित्ता ता.जि. हिंगोली येथे दिनांक २९/०५/२०१८ पासून कार्यरत होते.

५. गट विकास अधिकारी (श्रेणी-१), पंचायत समिती, हिंगोली यांचे दि.१९/०५/२०२० रोजीच्या आदेशान्वये कोव्हिड-१९ अनुषंगाने बाहेरगावातून आलेल्या व्यक्तीना Quarantine करावयाच्या ठिकाणी सोईसुविधा पुरविण्यासाठी जि. प. के.प्रा.शा खानापूर/विद्यासागर विद्यालय, खानापूर येथे

नियुक्ती आली होती. सदर आदेशाच्या अनुषंगाने कै.(श्री.) देशमुख यांना सदर कामी रुजु होण्याकरिता दिनांक १९/०५/२०२० रोजी मुख्याध्यापक, जि.प.के.प्रा.शा खानापूर यांनी कार्यमुक्त केले आहे.

६. कै.(श्री.) देशमुख यांची दि. २७/०७/२०२० रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली आहे. कै.(श्री.) देशमुख यांची मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, हिंगोली यांच्या आदेशानुसार त्यांची कोव्हिड-१९ बाबत कोरोना रुग्णासाठी Quarantine Centre वर नियोजन व देखभाल करणे या कर्तव्याकरिता दिनांक १९/०५/२०२० रोजीपासून नियुक्ती करण्यात आली होती. कै. (श्री.) देशमुख हे उपरोक्त दिनांक १९/०५/२०२० च्या आदेशानुसार कोव्हिड-१९ संबंधित नियोजन व देखभाल करणे कर्तव्याकरिता दिनांक १९/०५/२०२० ते दिनांक २५/०७/२०२० पर्यंत कार्यरत असून त्यांना दिनांक २६/०७/२०२० रोजी कोव्हिड-१९ ची लागण झालेली असल्याने दिनांक २९/०७/२०२० रोजी त्यांचा कोव्हिड संबंधित अहवाल पॉझिटीव्ह आला असून त्यांचा दि.०७/०८/२०२० रोजी मृत्यु झाला आहे. त्यानुसार कै.(श्री.) देशमुख हे इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर असल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांनी प्रमाणित केले आहे.

७. कै.(श्री.) देशमुख यांचेवर दिनांक २८/०७/२०२०१ ते दिनांक ०६/०८/२०२० या कालावधीत ऐ.आय.जी. हॉस्पीटल, हैद्राबाद (AIG) येथे कोव्हिड-१९ उपचार करण्यात आले. दिनांक ०७/०८/२०२१ रोजी कोव्हिड-१९ आजाराने मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, नाकाडे हॉस्पीटल, हिंगोली यांनी प्रमाणित केले आहे.

८. कै.(श्री.) देशमुख यांचा दिनांक ०७/०८/२०२० रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र ग्रामविकास अधिकारी, ग्रा.प. कार्यालय, पुसेगाव ता. सेनगाव जि. हिंगोली यांचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

९. मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, सेनगाव यांनी कै. (श्री.) देशमुख यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) निर्मला गंभीरराव देशमुख (पत्नी) (२) वैभव गंभीरराव देशमुख (मुलगा) (३) विवेक गंभीरराव देशमुख (मुलगा) (४) कोमल गंभीरराव देशमुख (मुलगी) यांना घोषित केले आहे.

१०. कै.(श्री.) गंभीरराव बाळासाहेब देशमुख, मुख्याध्यापक, केंद्र प्राथमिक शाळा, खानापूर चित्ता ता.जि. हिंगोली यांना २२०२ ०१७३-३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, हिंगोली यांनी प्रमाणित केले आहे.

११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली व वैद्यकीय अधिक्षक, नाकाडे हॉस्पीटल, हिंगोली यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, सेनगाव यांनी कै. (श्री.) देशमुख यांचे कायदेशिर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) निर्मला गंभीरराव देशमुख (पत्नी) (२) वैभव गंभीरराव देशमुख (मुलगा) (३) विवेक गंभीरराव देशमुख (मुलगा) (४) कोमल गंभीरराव देशमुख (मुलगी) यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक

अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र१२२/व्यय-५, दि.०३/०२/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> “मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर.”

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्षपणे प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०३२७१९२६२२०८२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.27 19:27:31 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), हिंगोली

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.२१/२०२२)